महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणाच्या **Software application** साठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि. (MAHAIT) यांच्याकडून क्लाऊड खरेदी करण्यासाठी झालेल्या खर्चासाठी सन २०२४-२५ मध्ये निधी वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## अल्पसंख्याक विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः वक्फ २०२४/प्र.क्र.५४/का.४**

मादाम कामा रोड, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख :३१.०३.२०२५

**वाचा-**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, पत्र क्रमांक: वक्फ २०१९/प्र.क्र.१७९/का.४, दि.२८.०२.२०२२.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ८०/अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२५

५) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन ज्ञापन क्रमांक वक्फ /२०२३प्र ४.का/५४.क्र. दि.१७.०३२०२५.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणाच्या Software application चे काम सूचना विज्ञान केंद्र सर्व्हिसेस इनकार्पोरेशन (NICSI) यांच्या वतीने करण्यात येत असून त्यासाठी होणाऱ्या खर्चास संदर्भ क्र.१ येथील दि.२८.०२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर ॲप्लीकेशन go Live करण्यासाठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि. (MAHAIT) यांच्याकडून क्लाऊड खरेदी करण्यात आलेले असून त्यासाठी त्यांनी निधी वितरित करण्याची मागणी केलेली आहे. सदर बाब विचारात घेता, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि. (MAHAIT) यांच्याकडून क्लाऊड खरेदीसाठी झालेल्या खर्चास संदर्भ क्र.५ येथील शासन ज्ञापनान्वये मान्यता दिलेली असून आता सदर खर्चासाठी वर्ष २०२४-२५ मध्ये अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

संदर्भ क्र. २,३ आणि ४ येथील परिपत्रक आणि नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणाच्या क्लाऊड खरेदीसाठी झालेल्या खर्चासाठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि. (MAHAIT) यांना रु.११,५७,२४६ /- (रुपये अकरा लाख सत्तावन्न हजार दोनशे शेहचाळीस मात्र) इतके अनुदान अदा करण्यासाठी अवर सचिव (का.१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. अवर सचिव (का.१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रु रु.११,५७,२४६ /- (रुपये अकरा लाख सत्तावन्न हजार दोनशे शेहचाळीस मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरित करण्यास तसेच कोषागारात देयक सादर करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्र.झेडई-१, २०५२ सचिवालयीन सर्वसाधारण सेवा"(००)(०३) इ-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी (२०५२ ५१२५) (कार्यक्रम) १७, संगणक खर्च या लेखाशिर्षामधून उपलब्ध होणाऱ्या निधीमधून भागविण्यात यावा.

४. सदर रक्कम ई कुबेर प्रणाली द्वारे M/s Maharashtra Information Technology Corporation Limited यांना अदा करण्यात यावी.

५. हा शासन निर्णय नियोजन विभाग अनौ.संदर्भ क्र.२२३/१४७१ दि. २४.०३.२०२५, वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.१४८/२०२५/व्यय-१, दि.३१.०३.२०२५ अन्वये प्राप्त मान्यता तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४ तसेच सहमतीनुसार आणि शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४ आणि शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ तसेच क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ८०/अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२५ अन्वये विभागांना प्रदान करण्यात आलेले अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३११८४५५८०८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
Date: 2025.03.31 18:47:22 +05'30'

**( मिलिंद शेणॉय )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
३. सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
४. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, हज हाऊस, छत्रपती संभाजीनर
५. उप सचिव (१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. उप सचिव (व्यय-१/अर्थसंकल्प शाखा-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अवर सचिव (का.१), तथा आहरण व संवितरण अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८. कक्ष अधिकारी (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
९. उप सचिव (का.४), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.